**सुगवे व सहा गावांच्या प्रादेशिक पाणी पुरवठा (ता.कर्जत, जि.रायगड) योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१२१६ /प्र.क्र.१६८ /पापु-०६**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**तारीख: १३ ऑगस्ट, २०१८**

वाचा:-

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक ववेका १०९८/सीआर ४३०/अ/पापु-१०, दिनांक ११.०३.१९९८
२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, ठाणे, पत्र क्र.मजीप्रामंठा/तां.शा.२/ ३५७०, दि.२४.११.२००९
३) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल, पत्र क्र.मजीप्रामंप/ तां.शा.पनवेल/ ९५, दि.१३.०१.२०१०
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक ग्रापापु-१२१०/प्र.क्र.६/पापु-०६, दिनांक २७.०४.२०१०
५) अधीक्षक अभियंता (प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल, पत्र क्र.मजीप्रामंप/ तां.शा.४/२०४७, दिनांक ०६.०८.२०१६
६) अधीक्षक अभियंता (प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल, पत्र क्र.अअ/ मजीप्रामंप/ तां.शा.४/१६१४, दिनांक २८.०६.२०१६
७) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९.०७.२०१४
८) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २०.०२.२०१५
९) ग्रामीण पाणी पुरवठा योजनेच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५.०६.२०१५ व दिनांक १४.०३.२०१६

प्रस्तावना:-

सुगवे व सहा गावांची प्रादेशिक पाणी पुरवठा योजना (ता.कर्जत, जि.रायगड)) या ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.२३४.००** लक्ष (ढोबळ) किंमतीच्या मूळ अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, योजनेची जादा दराची निविदा स्वीकारल्याने तसेच योजनेत तांत्रिक बदल व कामाच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे आणि अन्य अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या कामात वाढ झाली असल्याने योजनेच्या खर्चात वाढ झाली. यास्तव अधीक्षक अभियंता (प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या रु.३३०.८३ लक्ष (ढोबळ) किंमतीच्या प्रस्तावास संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्र.५ अन्वये सदर योजनेच्या रु.३७२.१९ लक्ष किंमतीच्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल यांनी शासनास

सादर केला आहे व योजनेस अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल यांनी संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुषंगाने प्रस्तुत योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची छाननीअंती सुगवे व सहा गावांची प्रादेशिक पाणी पुरवठा योजना (ता.कर्जत, जि.रायगड) या नळ पाणी पुरवठा योजनेची पुनर्सुधारीत किंमत खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| मूळ प्रशासकीय मान्यता | रु.२३४.०० लक्ष |
| सुधारीत योजनेची मंजूर किंमत | रु.३३०.८३ लक्ष |
| पुनर्सुधारीत योजनेची किंमत | रु.३६६.०३ लक्ष (वाढीव किंमत रु.३५.२० लक्ष) |

सुगवे व सहा गावांची प्रादेशिक पाणी पुरवठा योजना (ता.कर्जत, जि.रायगड) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.३६६.०३ लक्ष (ढोबळ ) (अक्षरी रुपये तीन कोटी सहासष्ट लक्ष तीन हजार फक्त) एवढ्या पुनर्सुधारीत किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

(१) उपरोक्त नमूद पुनर्सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.

(२) या योजनेस सहमती दिलेल्या मूळ व सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत व पुनर्सुधारीत तांत्रिक मान्यता देताना नमूद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

(३) ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल, रायगड यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कंत्राटदार व संबंधित ग्रामपंचायतीचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

(४) ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतेही अनुदान मिळणार नाही.

(५) सदर योजना पूर्ण झाल्यावर योजनेची चाचणी घेतल्यानंतर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरीत करुन घेणे बंधनकारक राहील, तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

(६) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्तीअभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/Non payment of electricity bills) बंद

पडल्याचे दिसून येते, यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद यांची राहील.

(७) हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(८) संदर्भ क्र.८ येथील शासन निर्णयातील निर्देशानुसार त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाची कार्यवाही करावी.

(९) प्रस्तुत योजनेचे काम पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत पूर्ण करण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

२. या योजनेच्या पुनर्सुधारीत किंमतीतील वाढीव खर्च रु.३५.२० लक्ष (अक्षरी रुपये पस्तीस लक्ष वीस हजार फक्त) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाखालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपारीक संदर्भ क्र.९४/१८/१४४३, दिनांक २७.०३.२०१८ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपारीक संदर्भ क्र.१८३/व्यय-३, दिनांक ३०.०६.२०१८ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१३१६१५४६७२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deelip Pandurang Patil

Digitally signed by Deelip Pandurang Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3810fd2c32f3841df60ca68a27ae50fdbc9fd6c506fd334325871d684bf3eef9, cn=Deelip Pandurang Patil
Date: 2018.08.13 16:21:24 +05'30'

**(दि. पां. पाटील)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री ( पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, ( पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सर्व मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य
५) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१/ २, मुंबई / नागपूर.
७) विभागीय आयुक्त, कोकण विभाग
८) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
९) जिल्हाधिकारी, रायगड
१०) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
१२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोकण विभाग, ठाणे

१४) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रायगड
१५) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल
१७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, ठाणे
१८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, रायगड जिल्हा परिषद, अलिबाग
१९) कार्यासन (पापु-०४, ०७, १०,१३,१७, १८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-०६.